जिल्हा उद्योग केंद्र योजनेची राज्यामध्ये
अंमलबजावणी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. ईपीपी-२०१६/प्र.क्र.३७/उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०१७.

<u>वाचा :-</u> १) भारत सरकार, उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अर्धशासकीय पत्र क्र.४४(५)/७६, दि. २६ नोव्हेंबर, १९७७.
२) भारत सरकार, उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे शासकीय पत्र क्रं. ४४(२)/७७-एसएसआय (II), दि. २३ फेब्रुवारी, १९८०.
३) महाराष्ट्र राज्यातील उद्योगधंद्यांना राज्याकडून सहाय्य देण्याबाबत महाराष्ट्र स्टेट एड टु इंडस्ट्रीज ॲक्ट १९६० व महाराष्ट्र स्टेट एड टु इंडस्ट्रीज नियम १९६१.
४) उद्योग संचालनालयाचे परिपत्रक क्र. डीआयसी/१२१/एलएन/८१-८२/३१९१, दि. १७ ऑगस्ट, १९८१.
५) महाराष्ट्र शासन उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांचा शासन निर्णय क्र. डीआयसी-१०८३/२७६७४/(२७५९)/उ-१८, दि. ०३ डिसेंबर, १९८५.
६) वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दि. ३० डिसेंबर, २०१४.

**<u>प्रस्तावना</u> :-**

राज्याच्या निमशहरी व ग्रामीण क्षेत्रातील अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमांना उद्योग उभारणीसाठी, वित्तीय सहाय्य उपलब्ध करुन त्यांचा विकास साधण्याचा व याद्वारे ग्रामीण व निमशहरी क्षेत्रात रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करणे या उद्देशाने केंद्र शासनाने संदर्भ क्रं .१ अन्वये दि. २६ नोव्हेंबर, १९७७ च्या अर्धशासकीय पत्रानुसार दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यातील अतिलहान व सुक्ष्म उद्योगांना भागभांडवल सहाय्य राज्याकडून उपलब्ध करून देण्याबाबत निर्देशित केलेले आहे. तसेच केंद्र शासनाचे संदर्भ पत्र क्रं. २, दि. २३ फेब्रुवारी, १९८० पासून राज्यामध्ये "जिल्हा उद्योग केंद्र कर्ज योजना" उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील सर्व जिल्हा उद्योग केंद्रामार्फत दि. १ एप्रिल, १९७९ पासून राबविण्यात येत आहे. तसेच राज्य शासनाचे संदर्भ क्र. ३ अन्वये निर्गमित महाराष्ट्र स्टेट एड टु इंडस्ट्रिज ॲक्ट १९६० व १९६१ अन्वये निर्देशित केलेल्या सर्व नियमास अधिन राहून राज्यामध्ये निमशहरी व ग्रामीण क्षेत्रातील अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमांना भागभांडवल स्वरुपात सदर योजनेंतर्गत वित्तीय सहाय्य उपलब्ध करण्यात येत असून जिल्हास्तरावर अंमलबजावणी करण्यात येत आहे. जिल्हा उदयोग केंद्र कर्ज योजनेमध्ये सुसुत्रता आणणे व प्रभावीपणे योजना राबविण्यासाठी उदयोग संचालनालयाचे परिपत्रक संदर्भ क्र. ४ अन्वये मार्गदर्शक सुचना व तसेच संदर्भ क्र. ५ अन्वये उद्योग, उर्जा व कामगार विभागाचे दि. ०३ डिसेंबर, १९८५ चे शासन निर्णयानुसार जिल्हा स्तरावर महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र यांना मंजूर प्रकल्प किंमतीच्या ६५ ते ७५ टक्के बँक कर्ज व सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यासाठी २० टक्के बीजभांडवल रु. २०,०००/- पर्यंत व अनुसुचित जाती व अनुसुचित जमातीमधील ३० टक्के रु. ३०,०००/- पर्यंत मंजूर करण्याचे वित्तीय प्राधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. आणि जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली उपसमितीला सर्वसाधारण लाभार्थीस (कमाल मर्यादा रु. ४०,०००/-) व अनु.जाती व अनुसूचित जमातीमधील लाभार्थीस ३० टक्के (कमाल मर्यादा रु. ६०,०००/-) पर्यंत बीजभांडवल कर्ज (मार्जीन मनी) कर्ज मंजूर करण्यासाठी वित्तीय प्राधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

संदर्भ क्र. ६ अन्वये वित्त विभाग शासन निर्णय दि. ३० डिसेंबर, २०१४ अन्वये राज्य शासनाच्या विविध विभागामार्फत, विविध संस्था/सहकारी संस्था/स्थानिक स्वराज्य संस्था/जिल्हा परिष्दा/महामंडळे/ शासकीय कंपन्या/व्यक्ती इत्यादीना विकास कामासाठी दिलेल्या कर्जाच्या माहिती संकलनासाठी व योग्य लेखांकनासाठी महाऋण आज्ञावली वित्त विभागामार्फत विकसित करण्यात आलेली आहे. महाऋण आज्ञावलीच्या सहाय्याने विकास कामासाठी उपलब्ध केलेली कर्जे वितरीत करणे अनिर्वाय करण्यात आलेले असल्याने व जिल्हा उद्योग केंद्र कर्ज योजनेचा शासन निर्णय निर्गमित केलेला नसल्याने, योजनेच्या स्वयंस्पष्ट मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

योजनेंतर्गत कर्ज वितरीत करण्याची प्रक्रिया सुलभ होण्यासाठी व महाऋण आज्ञावली मार्फत कर्जे वितरीत करणे अनिवार्य असल्याने, जिल्हा उद्योग केंद्र कर्ज योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u> :-

निमशहरी व ग्रामीण क्षेत्रातील अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमांना बीजभांडवल स्वरुपात अर्थसहाय्य देण्याच्या योजनेबाबतच्या अटी, शर्ती व कार्यपद्धती खालील प्रमाणे विहित करण्यात येत आहे.

**१. योजनेचे नांव :-** जिल्हा उद्योग केंद्र कर्ज योजना (निमशहरी व ग्रामीण क्षेत्रातील अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमांना बीजभांडवल म्हणून देण्यात येणारे कर्ज)

**२. योजनेचा उद्देश :-** निमशहरी व ग्रामीण क्षेत्रातील नविन अतिलहान व सूक्ष्म उद्योगांना / उपक्रमांना बीजभांडवल उभारण्यासाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करणे हा या योजनेचा उद्देश आहे. ज्या उद्योगांमधील यंत्रसामुग्रीमध्ये स्थिर भांडवली गुंतवणूक २.०० लाख रुपयापर्यंत आहे, अशा नव्याने स्थापित होणाऱ्या अतिलहान व सूक्ष्म उद्योगांना / उपक्रमांना या योजनेखाली मृदू कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य देण्यात येईल. ही योजना एक लाखापर्यंत लोकसंख्या असलेल्या व दहा लाख लोकवस्तीच्या शहराच्या बाहेर १५ कि.मी. पेक्षा अधिक अंतरावरील गांवाना लागू आहे.

**३. अंमलबजावणी यंत्रणा :-** उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील सर्व जिल्हा उद्योग केंद्रे .

**४. लाभार्थीचीं पात्रता :-**

४.१ शिक्षणाची व वयाची अट नाही. परंतु, लाभार्थ्याकडे संबंधित उद्योग करण्यासाठी लागणारे कौशल्य किंवा अनुभव असणे अपेक्षित आहे. वंशपरंपरागत उद्योग/व्यवसायाशी संलग्न अर्जदारांना योजनेंतर्गत प्राधान्य राहील.

४.२ योजनेंतर्गत स्थापित होणाऱ्या अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमाने त्यांचा उद्योग उत्पादनात गेल्यानंतर, **उद्योग आधार नोंदणी** प्राप्त करणे अनिवार्य आहे

४.३ नविन स्थापित होणाऱ्या अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमामधील यंत्रसामुग्रीची गुंतवणूक रुपये २.०० लाखापेक्षा कमी.

४.४ एक लाख लोकसंख्या (२०११ च्या जनगणनेनुसार) असणाऱ्या गांवामध्ये उद्योग सुरु करता येईल.

४.५ वैयक्तिक लाभार्थी, भागीदारी संस्था, खाजगी मर्यादित कंपनी आणि औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था.

५. **योजनेची व्याप्ती :-** योजनेंतर्गत बीजभांडवल सहाय्य मिळण्यासाठी उत्पादित व सेवा अतिलहान व सूक्ष्म उपक्रम पात्र आहेत. सेवा प्रवर्गातील पात्र अतिलहान व सूक्ष्म उद्योग उपक्रमांची यादी सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेली आहे. (परिशिष्ट-१)

६. **प्रकल्पाची किंमत :-** या योजनेमध्ये पात्र उद्योग व सेवा उद्योगाच्या प्रकल्प किमतीची कमाल मर्यादा रू. २.०० लक्ष राहील. उद्योग घटकाच्या प्रकल्प किमतीच्या एकूण स्थिर भांडवली गुंतवणूक व खेळत्या भांडवलाचे सिमांतिक भांडवल ( एकूण स्थिर भांडवलाच्या कमाल ३० टक्के मर्यादेत ) अंर्तभूत राहील.

**७. बीजभांडवल सहाय्याचा आकृतीबंध :-** जिल्हा उद्योग केंद्र कर्जयोजनांतर्गत (प्रकल्प किंमत रु. २.०० लक्ष मर्यादेपर्यत )

| अ.क्र. | प्रवर्ग / लाभार्थी | लाभार्थ्यांची स्वं-गुंतवणूकीचे प्रमाण | एकूण प्रकल्प किंमतीच्या देय बीजभांडवलाचे प्रमाण ( मार्जिन मनी) | वित्तीय संस्थाचे सहभागाचे प्रमाण |
|---|---|---|---|---|
| १. | सर्वसाधारण | ५ % | २०% | ७५% |
| २. | अनुसूचित जाती व जमाती मधील लाभार्थी | ५% | ३०% | ६५% |

**८. बीज भांडवल सहाय्यावर आकारावयाचे व्याज :-**

८.१ योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या बीज भांडवलाची रक्कम मृदु कर्ज (soft loan) म्हणून दरसाल ४ टक्के व्याजाने देण्यात येईल .

८.२ योजनेंतर्गत वितरीत केलेल्या बीजभांडवल परतफेडीचा कालावधी ४ वर्ष ६ महिने राहील व त्यामध्ये ६ महिने विलंबावधी समाविष्ट आहे. म्हणजेच बीजभांडवल मिळाल्यापासून ६ महिन्याच्या कालावधीनंतर परतफेड सुरु होईल व परतफेड पुढील ४ वर्षांमध्ये पूर्ण होईल. विलंबावधीतील संचित व्याजाची रक्कम विलंबावधीनंतर एक रक्कमी वसूल केली जाईल व उर्वरित ४ वर्षाच्या कालावधीमध्ये मुद्दल (समान वार्षिक हप्ते) व त्यावरील देय व्याजाची रक्कम वार्षिक हप्त्यांमध्ये वसूल केली जाईल.

८.३ लाभार्थ्यांनी परतफेड केलेली रक्कम प्रथम व्याजापोटी जमा करून उर्वरित रक्कम मुद्दलापोटी जमा केली जाईल.

८.४ बीज भांडवलाच्या कर्जाच्या रकमेची विहीत कालावधीत परतफेड करण्यात आली नाही तर थकीत रक्कमेवर द.सा.द.शे. १ टक्के दंडनीय व्याज आकारण्यात येईल.

**९. कार्यपध्दती :-** जिल्हा उद्योग केंद्रांनी संभाव्य लाभार्थीना मेळावे, बैठका, चर्चासत्र, प्रशिक्षण याव्दारे स्वयंरोजगारासाठी प्रवृत्त करावे. योजनेंतर्गत लाभ घेऊ इच्छिणाऱ्या अर्जदारांनी विहित नमुन्यात कर्जासाठी जिल्हा उद्योग केंद्राकडे अर्ज करावा. असा अर्ज कार्यालयात प्राप्त झाल्यानंतर, योजनेच्या अटी व शर्ती प्रमाणे योग्य त्या छाननीनंतर अर्जदार योजनेंतर्गत पात्र ठरल्यानंतर संबंधित अर्ज, अर्जदाराच्या कार्यक्षेत्रामधील संबंधित बँकेकडे शिफारशीसह कर्ज मंजूरीसाठी पाठविला जाईल. एकूण मंजूर प्रकल्प किंमतीच्या ६५ ते ७५ टक्के बँक कर्ज राहिल व सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यासाठी २० टक्के बीजभांडवल (कमाल मर्यादा रु. ४०,०००/-) अनु. जाती व अनुसूचित जमातीमधील लाभार्थीस ३०

टक्के (कमाल मर्यादा रु. ६०,०००/-) पर्यंत बीजभांडवल कर्ज (मार्जीन मनी) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांच्याकडून मंजूर करण्यात येऊन बँकेमार्फत लाभार्थ्यांना वितरीत करण्यात येईल. बीजभांडवल वाटप रक्कमेचे लाभार्थीनिहाय लेखे ठेवण्याचे व त्याची वसुली करण्याचे सर्व कामकाज जिल्हा उद्योग केंद्राकडून केले जाईल. सदर वितरीत केलेल्या बीजभांडवल कर्जाची द.सा.द.शे. ४ टक्के व्याजाने एकूण ४ वार्षिक हप्त्यामध्ये ६ महिन्याच्या विलांबावधीनंतर परतफेड देय राहील.

**१०. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.**

मुख्य लेखाशिर्ष ६८५१,
ग्रामोद्योग व लघु उद्योग यासाठी कर्ज (००)
१०२, लघु उद्योग, जिल्हा योजना ,
जिल्हा उद्योग केंद्रामधील ग्रामिण उद्योग प्रकल्प कार्यक्रमाकरीता कर्जे
५५, कर्जे व आगाऊ रकमा

सदर शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचना/निकष शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू राहील.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रं. ३७६/१४६१, दि. ३०/११/२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १८/व्यय-१६, दि. १३/०१/२०१७ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२१३१७२११५८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79,
serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2017.02.13 17:24:37 +05'30'

**( संजय देगांवकर )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) मा. मुख्य सचिवांचे उप सचिव
४) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
५) सर्व विभागीय आयुक्त, महसुल विभाग (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)
६) सर्व जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे) (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)
८) उद्योग सह संचालक, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व नागपूर (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)
९) अधिक्षकीय उद्योग अधिकारी, उप विभागीय कार्यालय, नांदेड (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)
१०) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व जिल्हे) (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत)

११) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
१२) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
१४) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) वित्त विभा़ग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७) निवड नस्ती (उद्योग-७), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

# परिशिष्ट-१

## - : उद्योग व सेवा उद्योगांची यादी खालीलप्रमाणे :-

१. स्वयंचलित चारचाकी वाहन दुरुस्ती कर्मशाळा.
२. ट्रॅक्टर आणि सर्व प्रकारचे शेतकी अवजारे दुरुस्ती कर्मशाळा.
३. सर्व प्रकारचे घड्याळे दुरुस्ती दुकान.
४. पंप आणि इंधन यंत्र दुरुस्ती कार्यशाळा.
५. वाहन रंगकाम (spray painting).
६. जॉबवर्क कार्यशाळा.
७. इलेक्ट्रोप्लेटींग ॲन्ड फिनिशिंग वर्क्स.
८. रेडीओ आणि दुरदर्शन संच दुरुस्ती.
९. सर्व प्रकारचे अवजारे दुरुस्ती काम.
१०. शिवण काम.
११. टंकलेखन, चक्रमुद्रण प्रती इत्यादी कामे (जॉबवर्क).
१२. मोटार रिवायडींग/दुरुस्ती कामे.
१३. टंकलेखन यंत्र दुरुस्ती.
१४. शिवणकाम यंत्र दुरुस्ती.
१५. नोझल तपासणी व दुरुस्ती.
१६. हीट ट्रीटमेंट शॉप
१७. पत्रा उद्योग व दुरुस्तीकाम.
१८. वेल्डींग आणि ब्रेझिंग वर्क्स.
१९. लाकडी फर्निचर तयार/दुरुस्ती करणे.
२०. डायनोमा व स्टॉटर दुरुस्ती.
२१. क्रॅक शाफ्ट व वेल्डींग ॲण्ड ग्राईंन्डींग वर्क्स.
२२. इंजिन री-बोअरींग दुरुस्ती.
२३. स्टोअरेज बॅटरी चार्जिंग व दुरुस्ती.
२४. बांधकाम खडीमिक्सर यंत्र व हायड्रोलिक जॅक दुरुस्ती.
२५. कुलूप आणि छत्री दुरुस्ती.
२६. बुट व चप्पल दुरुस्ती.
२७. कृषी व औद्योगिक उत्पादने यांचे ग्राईंडिंग कामे (जसे मसाले, चिनी माती/ धातुची भांडी इत्यादी).

--------